रुमाल क्र. ३८, पुडके क्र. १—समाप्त

**याद्या (चालू)—**

करांच्या प्रांताच्या सोडचिठ्या, २४ मोहरम, सु. १२१३/२८ जानेवारी १८१३ (६४९६—४९८); निपाणीकरांचा सरंजाम, इ. स. १८०८—१८०९ (४०३—४०५); निपाणीकरानी छत्रपति तिसरे शिवाजी यांजकडून घेतलेल्या सनदा, सु. स. १२१२—१२१३/इ. स. १८११—१८१२ (४२२—४२६).

**यादी ठराव—**सेनापतींच्या सरंजामासंबंधी, २५ सफर, सु. १२०४/४ जून १८०४ (६३४४—३४७).

## रुमाल क्र. ३९, पुडके क्र. १

**ज. क्र. १९३, रु. क्र. ३९, पु. क्र. १, का. सं. ६५४९—६६२३ (७५), सु. स. ११८०—१२७१, इ. स. १७७९—१८७०.**

**आज्ञापत्रे—**छत्रपति (शिवाजी ४ थे)—रामचंद्रराव घोरपडे : दामोदर भट मुनीश्वर यास लाट येथील जमीन पूर्ववत् चालवणे, ५ जावल, सु. १२४२/२५ जून १८४१ (६५८८); राजमंडळ करवीर गाव कामगार चिप्री व निमशिरगाव : विठोजी मोहिते यास दिलेल्या जमिनी २ मोहरम १२२८/२७ जुल १८२७ (५८५—५८६) राजमंडळ करवीर—गावकामगार महे : सबनिशीचा ऐवज पाठवणे, सु. स. १२१९/इ. स. १८१८ (५५६).

**इनायतनामा—**सुंदराबाई—एलफिन्स्टन : आबासाहेब छत्रपतीस पुत्रप्राप्ती, १ जाखर सु. १२१६/२९ एप्रिल १८१६ (६५५३).

**टिप्पण—**सावंतवाडीकरास दिलेल्या किल्ल्यासंबंधी, सु. स. १२२२/इ. स. १८२१ (६५६४).

**पत्रे—**छत्रपति (बुवासाहेब)—कलेक्टर व मॅजिस्ट्रेट दक्षिण प्रांत कोंकण : प्रसिद्धगडकरी व सोनगडकरी याना सावंतवाडीकराकडून; होणारा उपद्रव, ५ रज्जब, सु. १२२४/७ मार्च १८२४ (६५७४) छत्रपति (बुवासो)—पो. एजंट (टाकरीन) : नारायण दीक्षित याच्या सनदेची चौकशी, ५ जिल्काद, सु. १२२४/१४ जुलै १८२३ (५७३); छत्रपति (संभाजी २ रे) एलफिन्स्टन, बोलणी करण्यासाठी भाऊ महाराज याची रवानगी, १२ रावल, सु. १२१८/२० जानेवारी १८१८ (५५५) रेसिडेंट इमसबेल—छत्रपति (संभाजी २ रे)—कंपनीच्या लष्कराकडे नेण्यात येत असलेल्या मालास झालेला अडथळा, ११ जिल्हेज सु. १२१६/१३ नोव्हेंबर १८१५ (५५४); सुंदराबाई—छत्रपति (आबासाहेब व बुवासाहेब) : सुबराव घोरपडे याजकडून वसूल करावयाचा गल्ला, इ. स. १८१२—२१ (५५१); कमिशनर चॅपलीन—छत्रपति (बुवासाहेब) : प्रसिद्धगड व नरसिंह येथील वसूल, १८ सव्वाल, सु. १२२३/८ जुलै १८२२ (५६९—५७०); दिनकरराव गायकवाड—छत्रपति (बुवासो) : खास विडयांची रवानगी व गव्हर्नरशी भेट, इ. स. १८२२—३८ (५७१—५७२).

**इतर—**खेमसावंत सरदेसाई—छत्रपति (शिवाजी ३ रे) : मनोहरगड, सिंधुदुर्ग इ. स. उपद्रव देणार नाही, इ. स. १७७९—१८१२ (६५४९); खुमानपुरी महंत नांदोसी—छत्रपति (शिवाजी ४ थे) : शहापूर गाव जप्तीतून मुक्त करणेची मागणी, ३ जावल, सु. १२४५/१० मे १८४५ (५९५); रघुनाथराव गोविंद—छत्रपति (शिवाजी ४ थे) : भगवंतराव शिंदे यांच्या मृत्यूची तारीख, २५ सफर, सु. १२४३/२७ मार्च १८४३ (५९४); आबा महाराज—गणेशपंत तांबे : येण्यासाठी सरंजाम पाठविणे, इ. स. १८६६—७० (६२३); गव्हर्नर एलफिन्स्टन—सुंदराबाई : सिंहासनबतीशी ह्या छापील पुस्तकाची भेट, इ. स. १८१२—२५ (५५२); जानकीबाई प्रतिनिधि—मुख्य कारभारी करवीर : आपले व धर्मादाय इनामी उत्पन्न चालवण्याची विनंती, २८ ऑगस्ट १८५० (६१२); जिवाजीराव शिर्के—दिवाणसाहेब : चिरंजिवाचा विवाह, १९ जिल्काद, सु. १२२८/३ जून १८२८ (५८४); दत्ताजीराव गायकवाड—पो. सुपरिंटेंडेंट हॅवलॉक : हेरले

रुमाल क्र. ३९, पुडके क्र. १—चालू

**इतर (चालू)—**

येथील नाईकीचे वतन, ३ डिसेंबर १८६० (६१९); नारायणराव घाटगे—दिनकरराव गायकवाड : कुरणाकडील गवत पाठविणे, इ. स. १८३९—४४ (५८७); बायजाबाई शिंदे—आनंदराव यशवंत : खंडेराव दौलत व रामचंद्रराव घाटगे यांची व छत्रपतींची भेट करवून देणे, ५ जावल, सु. १२४३/१५ जून १८४२ (५९०); दिनकरराव गायकवाड : दिवाणसाहेब (सईबाई) यांचा रोष नाहीसा करणे, ५ जावल, सु. १२४३/१५ जून १८४२ (५८९); भवानराव आबाजी—अहिल्याबाई : राजाराम छत्रपतींचा विवाह, ११ जिल्काद, सु. १२६७/१८ मार्च १८६७ (६२२); मुरारराव नाईक निंबाळकर—पो. सुपरिंटेंडेंट (ग्रॅहॅम) : शिपूर व मतीवाड येथील इनाम जमिनीस इचलकरंजीकराकडून होणारा उपद्रव, २८ फेब्रुवारी १८४७ (६०३).

**प्रकरणी कामे—**दत्तवाडकर नारायणराव घोरपडे यांच्या दर्जाबाबत, २७ एप्रिल १८५० (६६१५—६१८); दत्ताजीराव गायकवाड याजकडील दुस्तपट्टीचा ऐवज, ३१ जुलै १८४७ (६०७—६१०); मुरारराव निंबाळकर याचा सावगांव व तळंदगे येथील देणे ऐवज, ३० सप्टेंबर १८६२ (६२०—६२१); मुरारराव निपाणीकर यांच्या सनदांच्या खरेपणाबाबत, २१ सप्टेंबर १८४६ (६०४—६०५); यादगडच्या हक्कासंबंधी, १५ मार्च १८५० (६१३—६१४); विशाळगडकर प्रतिनिधि यांची सरंजामी नोकरी, २९ डिसेंबर १८४५ (५९६—६००).

**यादीपत्रे—**पो. एजंट—सदाशिवपंत वकील : नाना तळेगांवकर याचा शोध, इ. स. ३ ऑक्टोबर १८४२ (६५९१); पो. एजंट (रीड)—करवीरकर वकील : कळसोली मुक्कामी झालेली बोलणी, २१ मार्च १८२२ (५६५); सदाशिवपंत वकील—पो. एजंट : नाना तळेगांवकर याचा शोध, १६ सप्टेंबर १८४२ (५९२—५९३); नारायणराव घोरपडे—पो. एजंट : दत्तवाडची जप्तीतून मोकळीक, इ. स. १८४६—४७ (६०६).

**याद्या—**करवीरकर व सावंतवाडीकर यामधील प्रसिद्धगडाबाबतचा तंटा, इ. स. १८२१—२२ (६५६३); करवीरकरांनी सावंतवाडीकरांचा घेतलेला मुलूख, १७ मार्च १८२२ (५६७); करवीरकरांनी सावंतवाडीकरास द्यावयाचा मुलूख, २० मार्च १८२२ (५६६); जगदगुरु, पथकांतील लोक इ. बाबत करवीरहून छत्रपतींना पाठवलेली माहिती, २३ जाखर, सु. १२२७/२२ जानेवारी १८२७ (५७५—५७६); दौलतराव निंबाळकर यांचा कलनाकवाडीवरील हक्क, ३१ मे १८४६ (६०१—६०२); नरसिंहगड, भरतगड इ. किल्ल्यांचा वसूल, २२ जाखर, सु. १२२२/१७ मार्च १८२२ (५५७—५६२); पर्जन्यवृष्टी इ. बाबत करवीरहून छत्रपतींना पाठविलेली माहिती, इ. स. १८२६ (५७७—५७८); भवानी देवीकडे करावयाचे अनुष्ठान व ब्राह्मण संतर्पण, इ. स. १८००—३८ (५५०); लष्कर मुक्कामांतील मजकूर, ३ रज्जब, सु. १२२७/३१ जानेवारी १८२७ (५७९—५८०); सरकारी दागिन्यांत सोनाराने केलेली लबाडी, ९ जावल, सु. १२२७/९ डिसेंबर १८२६ (५८१—५८३); सुभा कुडाळ संबंधी करवीरकर व वाडीकर यांच्यातील खटला, फाल्गुन व. ९, शके १७४३/१७ मार्च १८२२ (५६८); हिंदुराव गायकवाड यांचे उत्पन्न, २८ जून १८४९ (६११).

**ज. क्र. १९३, रु. क्र. ३९, पु. क्र. २, का. सं. ६६२४—६७६४ (१४१), सु. स. ११७०—१२६३, इ. स. १७६९—१८६२**

**आज्ञापत्रे—** राजमंडळ करवीर—बाळोजी निकम व मोरो चिटको : चुकलेल्या घोडयाचा तपास व नरतवडे येथील गल्ला वसूली, २८ राखर, सु. १२२५/२० डिसेंबर १८२४ (६६८७)—हणमंतराव निंबाळकर : सिधोजीराव निंबाळकर याचे हक्क, ९ जावल, सु. १२२६/२० डिसेंबर १८२५ (७०१).

**रुमाल क्र. ३९, पुडके क्र. २—चालू**

**इनामपत्रे**—छत्रपति (शिवाजी ३रे)—सिधोजीराव निंबाळकर देसाई : निपाणी हा गांव इनाम, चैत्र शु. १, रा. श. १३८/१४ मार्च १८१२ (६६७६).

**पत्रे—छत्रपति (बुवासाहेब) यांना दौलतराव जाधव यांची** :— चॅपलीन यास थैली पोचती केली, २४ रावल, सु. १२२५/१६ नोव्हेंबर १८२४ (६६८५); बेलेवाडी येथे इंग्रजी लष्कराचा मुक्काम, १८ रावल, सु. १२२५/१० नोव्हेंबर १८२४ (६८६) व १७ रावल, सु. १२२५/९ नोव्हेंबर १८२४ (६९१); चॅपलीन याचा नोंदणी मुक्काम, २३ रावल, सु. १२२५/१५ नोव्हेंबर १८२४ (६८९); इंग्रजाकडील वर्तमान, १६ रावल, सु. १२२५/८ नोव्हेंबर १८२४ (६९२).

**छत्रपति (बुवासाहेब) यांना-हणमंतराव निंबाळकर यांची**— फौजेचा खर्च, १६ सफर, सु. १२२८/९ सप्टेंबर १८२७ (६७०२) कृष्णराव गर्दे यांच्या घरचे लग्नकार्य, १४ सव्वाल, सु. १२२७/११ मे १८२७ (७०३—७०४); क्षेमसमाचार, १५ सफर, सु. १२३५/२३ जून १८३४ (७३४);

**छत्रपति (बुवासाहेब) यांना-इतरांची**—आप्पाजीराव जाधव जप्तन मुलूख : राणोजी पाटील यास अटक, ३० रमजान, सु. १२२६/८ मे १८२६ (६६९६); करवीरकर वकील : आनंदराव व बाळकृष्णराव वकील यांच्या पत्राची रवानगी, १५ राखर, सु. १२२५/७ डिसेंबर १८२४ (६८८) व रामरावजी समागमे थैलीची रवानगी, १५ जाखर सु. १२२६/२४ जानेवारी १८२६ (६९९); खंडोजी भोसले, वाळवे येथील मजकूर, १ जिल्काद, सु. १२२५/२९ जून १८२४ (६९४); दौलतराव जाधव व सखाराम माणकेश्वर देशपांडे : चॅपलीन याचा दौरा, २५ रावल, सु. १२२५/१७ नोव्हेंबर १८२४ (६९०);

दौलतराव जाधव व सखाराम माणकेश्वर देशपांडे : चॅपलीन यास पाठवलेले लबेचे सामन, २९ रावल, सु. १२२५/२१ नोव्हेंबर १८२४ (६६९५); पो. ए. टाकरीन : हसूर इ. गांवे सावंतवाडीकरास देण्या-प्रकरणी, १ जिल्हेज, सु. १२२४/८ ऑगस्ट १८२३ (६८३); बळवंत शिर्के : बंदूकबारदारांची रवानगी, २१ सव्वाल, सु. १२२६/९ जून १८२५ (६९७) व मुरगूड परगण्यातील चार कुळांची रवानगी, ५ साबान, सु. १२२६/१५ मार्च १८२६ (६९८); भवानराव देशमुख ठाणे शेंदूर : निपाणीकरांचा जमाव, १५ रावल, सु. १२२५/७ नोव्हेंबर १८२४ (६९३); रखमाबाई घाटगे : चोकाक येथील शेरी जमिनीचा ऐवज, इ. स. १८२२—३८ (६८१—६८२); राणोजी व कृष्णाजी निंबाळकर : प्रसिद्धगड देवस्थानचा प्रसाद, इ. स. १८२२—३८ (६८०); रुपाजी जाधव व गोपाळ बावाजी : रावजी व बाबू पाटील यामधील तंटा, २० जिल्हेज, सु. १२२६/६ ऑगस्ट १८२५ (७००);

**इतर**—नारायणराव बाजी घाटगे—छत्रपति (संभाजी ३रे) : बापू साळोखे व बाळाजीपंत यांची रवानगी, इ. स. १८१२—२१ (६६७८); चिमाकाबाई घाटगे—आईसाहेब : धोतरजोडी, पैठणी इ. पाठवल्यासंबंधी, बिनसाली (७६३).

**नारायणराव घाटगे यांची इतराना**—आईसाहेब : क्षेमसमाचार, इ. स. १८१२—२५ (६६७७); आनंदराव मंत्री : हवेलीची वास्तुशांती इ. स. १८१२—३८ (६७९); दिनकरराव गायकवाड : कागल मुक्कामी पोचल्यासंबंधी, इ. स. १८३९—४४ (७४३).

**दिनकरराव गायकवाड यांना इतरांची**—बायजाबाई शिंदे : खंडेराव दौलत व रामचंद्रराव घाटगे मजकूर सांगतील, ५ जावल, सु. १२४३/१५ जून १८४२ (६७५१); यशवंतराव घाटगे : बाचणी व खेबवडे यामधील सीमातंटा व मकर संक्रमणाची तीळशकंरा, इ. स. १८३९—४४ (७४४—७४५);

**रुमाल क्र. ३९, पुडके क्र. २—समाप्त**

**पत्रे—दिनकरराव घाटगे यांना (चालू)**—व्यंकटराव पाटणकर : रामचंद्रराव पाटणकर याची रवानगी, इ. स. १८३९—४४ (६७४२).

**इतर**—सिमसन—सदाशिव अनंत, रामराव अखबारनवीस याची बडतर्फी, १२ ऑगस्ट १८४१ (६७४७);

(प्रेषकाचा नामोल्लेख नाही)—छत्रपति (बुवासाहेब), भेटीस येत आहे, ५ जावल, सु. १२२५/२६ डिसेंबर १८२४ (६८४).

**प्रकरणी कामे**—दत्ताजीराव गायकवाड विश्वासराव याची अमानत रक्कम परत करण्याबाबत, ७ मार्च १८६२ (६७६०-७६२); हणमंतराव निंबाळकर याचा महागांव येथील नाईकी वतनाचा ऐवज, २४ राखर, सु. १२४५/२ मे १८४५ (७५६-७५९);

**यादीपत्रे**—पो. एजंट—सदाशिवपंत वकील : तळीखोर पतंग व देसाई याचा बंदोबस्त, ६ सप्टेंबर १८४२ (६७४८) व छत्रपतींच्या शिक्षणाकरिता पुस्तकाची रवानगी, २७ जुलै १८४२ (७५०); सदाशिवपंत वकील—पो. एजंट : छत्रपतींच्या शिक्षणाकरिता पाठविलेल्या पुस्तकांची पोंच, आषाढ व. १४, शके १७६४/५ ऑगस्ट १८४२ (७४९).

**याद्या**—महाकाली, करवीर निवासिनी व त्र्यंबोली यांचे नैवेद्य, बिनसाली, (६७६४); सदाशिव अनंत याच्या वकिलीच्या नेमणुकी-बाबत, इ. स. १८४० (७४६); साळसो महालांतील दीड तक्षीम हक्कांतील हिस्सेदार, इ. स. १८२९ (७०५—७२१).

**हिशेब**—पंत अमात्य यांच्याकडील गावांचा हिशेब-मुणगे इ. स. १८३८ (६७३५-७४१), बांदीवडे इ. स. १७६९ (६२४-२६); व इ. स. १८३०—३१ (७२२-३३); हिंदोले १७६९ (६२७-३०); व इ. स. १८२४ (७५२—५५) तसेच साळशी महालातील दीड तक्षीम व वतनी हक्काबाबत इ. स. १७७६—७९ (६३१-७५).

**रुमाल क्र. ४०, पुडके क्र. १**

**ज. क्र. १९४, रु. क्र. ४०, पु. क्र. १, का. सं. ६७६५–७००५ (२४१)**
**सु. स. १२१३–१२२६, इ. स. १८१२–१८२५**

**आज्ञापत्रे—सुंदराबाई यांची**—मोरो बाजीराव चिटणीस: दिनकरराव भोसले यांच्या पत्राप्रमाणे व्यवस्था करणे, १९ जाखर, सु. १२१५/८ जून १८१४ (६८८०) व पुण्यातील कामकाजासंबंधी ४ रज्जब, सु. १२१५/२३ जून १८१४ (८८८-८८९).

**सुंदराबाई यांची स्वरूपजी क्षीरसागर यांना**—कागल प्रांतासंबंधी इंग्रजांशी बोलणी करण्याविषयी, २६ रमजान, सु. १२१४/२२ सप्टेंबर १८१३ (७९६-७९९); संशय न घेता पूर्ववत् काम करणे, १७ सव्वाल, सु. १२१४/१३ ऑक्टोबर १८१३ (८१८); इंग्रजाकडील कामकाजे, ६ जिल्काद, सु. १२१४/३१ ऑक्टोबर १८१३ (८२९); यशवंतराव घाटगे व आऊबाई यांच्या जेजुरी, तुळजापूर व पुणे भेटी-संबंधी, २६ जिल्काद, सु. १२१४/२० नोव्हेंबर १८१३ (८४३-८४४); २७ जिल्काद, सु. १२१४/२१ नोव्हेंबर १८१३ (८४५).

**इतर**—छत्रपति (संभाजी २ रे)—पांडुरंग नाईक : कर्जाऊ घेतलेल्या ऐवजाची खातरजमा, श्रावण शु. १०, रा. श. १४१/२६ जुलै १८१४ (६९१८); प्रभाकरपंत बल्लाळ यांना : कर्जफेडीसंबंधी, इ. स. १८१४ (९१९); राजमंडळ करवीर—कल्याणराव कृष्ण : सोडचिठ्याप्रमाणे स्वाधीन झालेल्या गावासंबंधी, २९ मोहरम, सु. १२१४/२२ जानेवारी १८१४ (८५९-८६०).

**टिप्पणे**—स्वरुपजी क्षीरसागर यास मारल्या प्रकरणी जेजुरी मुक्कामी बाळाबाई आक्का भाऊ महाराज इ. ची झालेली बोलणी, इ. स. १८१३ (६८४७-८४८); स्वरुपजी क्षीरसागर याजवर झालेला विष-

टिप्पणे (चालू)—

प्रयोग, इ. स. १८१३ (६८३३-८३८); हैबतराव गायकवाड याजकडे कारभार दिल्यासंबंधी, इ. स. १८१४ (८९२-८९४).

**पत्रे—छत्रपति (संभाजी २ रे)—एलफिन्स्टन**—कामकाजे करण्याविषयी, ११ जाखर, सु. १२१४/११ जून १८१३ (६७७२–७७३), (७९४-७९५ व ९४८-९४९); निपाणीकरांनी नेलेली घोडी, गुरे वगैरेसंबंधी, १७ रज्जब, सु. १२१४/१६ जुलै १८१३ (७७८-७८०); सुलतानराव कदम व यमाजी दिनकर नेरलीकर यांच्या कुटुंबाची सुटका, १ रमजान, सु. १२१४/२८ ऑगस्ट १८१३ (७८७-७८८); कागल इ. तालुक्याच्या सोडचिठचासंबंधी, २१ सव्वाल, सु. १२१४/१७ ऑक्टोबर १८१३ (८१९-८२०); यशवंतराव घाटगे यांची पुणे भेट, २५ जिल्काद, सु. १२१४/१९ नोव्हेंबर १८१३ (८३९-८४०); हणमंतराव निंबाळकर यांची पुणे येथे होणारी भेट २६ जिल्काद, सु. १२१४/२० नोव्हेंबर १८१३ (८४१-८४२); निपाणीकरांकडून येणे असलेला वसूल ऐवज, १ मोहरम, सु. १२१४/२५ डिसेंबर १८१३ (८५५); निपाणीकर इ. नी दिलेला उपसर्ग, १० सफर, सु. १२१४/२ फेब्रुवारी १८१४ (८६१–८६२); निपाणीकराकडून मिळावयाची गावे, ४ रज्जब, सु. १२१५/२३ जून १८१४ (८९०-८९१), २१ राखर., सु. १२१५/२ एप्रिल १८१५ (९२७-९२८); प्रतिनिधि यांच्या प्रांतात झालेल्या दंग्याचा बंदोबस्त, १२ रावल, सु. १२१५/२२ फेब्रुवारी १८१५ (९०५-९०६); मोरो बाजीराव चिटणीस कामकाजाविषयी बोलणी करतील, २१ रावल, सु. १२१५/३ मार्च १८१५ (९०७–९०८); आप्पाजी निंबाळकर यांचा देणे ऐवज, १४ राखर, सु. १२१५/२६ मार्च १८१५ (९०९–९१०); अंबिकाबाई यांना करवीरी आणावयास रहदारीची परवानगी, ९ जावल, सु. १२१५/२० एप्रिल १८१५ (९१३-९१४); बोलणी करण्यासाठी मोरो बाजीराव चिटणीस याची रवानगी, ५ साबान, सु. १२१५/२३ जुलै १८१४ (९१६); नांदणीची सोडचिठी, ११ रमजान, सु. १२१५/२७ ऑगस्ट १८१४ (९२०-९२१); पांडुरंग नाईक यांच्या मुलामाणसाची अटकेतून मुक्तता, १० जिल्हेज, सु. १२१५/२३ नोव्हेंबर १८१४ (९२२-९२३); भेट म्हणून पाठविलेल्या वस्तूंची पोच, २७ मोहरम, सु. १२१६/२९ डिसेंबर १८१५ (९४४-९४५); पुण्यातील सावकाराकडून घेतलेले कर्ज, २७ साबान, सु. १२१६/४ ऑगस्ट १८१५ (९५४-९५५); चतुरसिंगाच्या बंडाचा बंदोबस्त, २४ जाखर, सु. १२१६/२२ मे १८१६ (९५८-९६०); कामकाजाविषयी, १९ मोहरम, सु. १२१७/९ डिसेंबर १८१६ (९७३-९७४); दिनकर आप्पाजी यांची मजकूर सांगून रवानगी, ७ रज्जब सु. १२१७/२४ मे १८१७ (९९०); बापू गोखल्याच्या फौजेपासून होणारा उपद्रव, इ. स. १८१७ (१००४-००५),

**छत्रपति (संभाजी २ रे) यांची—इतराना**—कर्नल विल्यम डौस : निपाणीकराकडील गावाच्या सोडचिठ्या, ४ जिल्हेज, सु. १२१४ २८ नोव्हेंबर १८१३ (६८५३-८५४); कोर्ट लँड ब्रुटोस : देवी नाईक याजकडून येणे असलेला गुराबचा ऐवज, १ साबान, सु. १२१४/३० जुलै १८१३ (७८५-७८६).

**एलफिन्स्टन-छत्रपति (संभाजी २ रे)**—भाऊ महाराज व दिनकरराव गायकवाड यांची वकिली, ८ जाखर, सु. १२१४/२८ मे १८१४ (६७७१); भाऊ महाराज व दिनकरराव गायकवाड यांच्या पत्रावरून सविस्तर समजेल, १८ जून १८१३ (७७६-७७७); हिंदुराव घाटगे यास होणारा उपसर्ग, ९ ऑक्टोबर १८१३ (७८९-७९१); कागल प्रांतावरील छत्रपतींचा अधिकार, १० नोव्हेंबर १८१३ (८२७-८२८); करवीर प्रांतात निपाणीकराने जबरदस्तीने केलेला वसूल, ६ फेब्रुवारी १८१४ (८६३-८६४); बाबाजीराम साठे याची अखबारनवीस म्हणून नेमणूक, १ नोव्हेंबर १८१४ (८९६); आप्पाजी निंबाळकर यांचा देणे ऐवज, १ एप्रिल १८१५ (९११–९१२) पुत्रप्राप्ती निमित्त आहेर, २५ नोव्हेंबर १८१५ (९३७-९३८); पेशव्यांकडील भाऊसाहेब दिवाण यांची महालक्ष्मीच्या दर्शनाचे वेळी



**पत्रे—एलफिन्स्टन—छत्रपति (संभाजी २ रे) (चालू)—**

करवीरी भेट, २५ फेब्रुवारी १८१६ (९४६); भाऊ महाराजांची कामगिरी, १८ एप्रिल १८१५ (९४७); कामकाजासंबंधी, २० जुलै १८१५ (९५०-९५१); पुण्यातील सावकाराकडून घेतलेले कर्ज, ३० सप्टेंबर १८१५ (९५६); मोरोपंत चिटणीस याजबरोबर बोलणे करण्यासंबंधी, २७ नोव्हेंबर १८१६ (९६८-९६९); खानापूर व हेबाळ येथे झालेल्या लुटीसंबंधी, ११ डिसेंबर १८१६ (९७०); पुण्यातील कामकाजासंबंधी, ९ जानेवारी १८१७ (९७७-९७८); भाऊ महाराज मजकूर सांगतील, ३१ मार्च १८१७ (९८३-९८४); बापू रामोसी इ. बंडवाल्यांना आश्रय न देणे, ३ मे १८१७ (९८८-९८९).

**एलफिन्स्टन यांची सुंदराबाई यांना**—पुण्यातील कामकाजाविषयी १८ जून १८१३ (७७४–७७५); सईबाईच्या रजोदर्शनानिमित्त आहेर, ९ नोव्हेंबर १८१४ (८९७-८९८); जिजाबाई यांच्या रजोदर्शनाच्या शर्करेची पोच, ८ नोव्हेंबर १८१५ (९३६); मोरो बाजीराव चिटणीस याजबरोबर झालेली बोलणी, १० जानेवारी १८१७ (९७५-९७६); भाऊ महाराज मजकूर सांगतील, ११ मार्च १८१७ (९८१-९८२);

**एलफिन्स्टन यांची इतराना**—छत्रपति (शिवाजी ३ रे) : सावंतवाडीकराकडून भरतगड खाली करण्यासंबंधी, २३ फेब्रुवारी १८१[illegible] (६८०३-८०४); कृष्णराव गोपाळ : वेंगुर्ली किल्ला इंग्रजास देण्या संबंधी, इ. स. १८१३ (८०२); पांडुरंग नाईक : करवीराकडून येणे असलेल्या ऐवजाची फड, १९ जानवारी १८१४ (८६६); बाजीराव साठे : त्रिंवकजी डेंगळेस पकडण्याबाबत जाहीरनामा काढणे, २२ [illegible] १८१७ (९९४).

**छत्रपति (संभाजी २ रे) यांना इतरांची**—दिनकरराव गायकवाड पांडुरंग नाईक यांचा देण एवज, २४ मोहरम, सु. १२१४/१७ जानवा[illegible] १८१४ (६८६५); बाळोजी बाजीराव चिटणीस : वसूल ऐवजाबाब इंग्रजाशी बोलणी, इ. स. १८१७ (९७९-९८०); शंकरराव शिंदे सेन खासकेल : निपाणीकराकडील गावांच्या सोडचिठ्या, १८ मोहरम सु. १२१४/११ जानवारी १८१४ (८५६-८५८).

**भाऊ महाराज - सुंदराबाई**—आर्थिक अडचणीसंबंधी, इ. [illegible] १८१३ (६८४९-८५०); कृष्णराव गोपाळ यांच्या बंदोबस्ताविषयी इ. स. १८१४ (८७६ व ८८१-८८३); व पालखी देण्याविषयी इ. स. १८१५ (९१५).

**भाऊ महाराज इतराना**—दिनकरराव गायकवाड, कृष्णर[illegible] गोपाळ संबंधी पाठवावयाची थैली, इ. स. १८१४ (६८७७-८७८) बाळाबाई आक्का निंबाळकर, खर्चाच्या व्यवस्थसंबंधी, इ. स. १८१[illegible] (८५१); व्यंकोबा वाघमारे, निपाणीकराकडून यणे असलेला ऐव[illegible] इ. स. १८१३ (८५२); सदाशिव अनंत, पूर्वीच्या यादीप्रमाणे क[illegible] करणे, इ. स. १८१४ (८७९).

**सुंदराबाई-एलफिन्स्टन**—मिठाई, अंडी इत्यादी पाठविल्याबा[illegible] २५ रमजान, सु. १२१४/२१ सप्टेंबर १८१३ (६७९२-७९[illegible]) सईबाई यांना ऋतुप्राप्ती, ५ जिल्काद, सु. १२१५/१९ ऑक्टो[illegible] १८१४ (८९५); सईबाईच्या गर्भाधानानिमित्त पाठविलेला आहे[illegible] १४ जिल्हेज, सु. १२१५/२७ नोव्हेंबर १८१४ (९०१-९०२) जिजाबाई यांच्या रजोदर्शनाची शर्करा, १४ जिल्काद, सु. १२१[illegible] १८ ऑक्टोबर १८१५ (९३५); आहेराची पोच, २७ मोहरम, [illegible] १२१६/२९ डिसेंबर १८१५ (९४०-९४१); भाऊ महारा[illegible] करवी मजकूर कळविण्याबाबत, १९ मोहरम, सु. १२१७/९ डिसें[illegible] १८१६ (९७१-९७२); छत्रपति दुसरे संभाजी यांना पुत्रप्राप[illegible] ३० एप्रिल १८१६ (९८५-९८६).

**सुंदराबाई यांची इतराना :**—भाऊ महाराज : मोरो बाजी[illegible] चिटणीस यास द्यावयाचा ऐवज, इ. स. १८१४ (६८८७); रेसि[illegible] डनलॉप : छत्रपति (संभाजी २ रे) यांना पुत्रप्राप्ती, १ जाखर, [illegible] १२१७/१९ एप्रिल १८१७ (९८७).

रुमाल क्र. ४०, पुडके क्र. १—चालू

**पत्रे (चालू)—**

**दादो आनंदराव-कल्याणराव कृष्ण**—बेलवले इत्यादी निपाणीकराकडील गावे करवीरकरांच्या स्वाधीन करणे, १७ मोहरम, सु. १२१५/३० डिसेंबर १८१४ (६९२६); संवदतीकर गोसावी याने करवीरकरांच्या आज्ञेत वागावे, ३ सफर, सु. १२१५/१५ जानेवारी १८१५ (९३२); चिंचणीकर घोसरवाडकर इ. नी करवीरकरांच्या आज्ञेत वागणे ३ सफर, सु. १२१५/१५ जानेवारी १८१५ (९३३-९३४).

**दादो आनंदराव यांचे—बापूजी कृष्ण याना**—इंगळी गाव करवीरकरांच्या स्वाधीन करणे, २१ जिल्काद, सु. १२१४/१५ नोव्हेंबर १८१३ (८३०); सिधोजीराव निंबाळकराकडील कटकोळ, सावगाव इ. गावे करवीरकरांच्या स्वाधीन करणे, ९ जिल्हेज, सु. १२१४/३ डिसेंबर १८१३ (८३१-८३२);

**सदाशिव माणकेश्वर यांची**—घोसरवाडकर देसाई : करवीरकरांच्या आज्ञेप्रमाणे वागणे, १० जिल्हेज, सु. १२१५/२३ नोव्हेंबर १८१४ (९३०); चिंचणीकर देसाई : करवीरकरांशी एकनिष्ठ राहणे, २१ सफर, सु. १२१५/२ फेब्रुवारी १८१५ (९२९); सिधोजीराव निंबाळकर : कागलपैकी सात गावे कल्याणराव कृष्ण यांच्या स्वाधीन करणे, १२ जिल्हेज, सु. १२१५/२५ नोव्हेंबर १८१४ (९२४) व यशवंतराव घाटगे यास परत द्यावयाची गावे, २५ सफर, सु. १२१५/६ फेब्रुवारी १८१५ (९२५);

**इतर—आप्पा देसाई चिंचणीकर**—सुंदराबाई, कृष्णराव गोपाळ संबंधी इंग्रजाकडे पाठवावयाची थैली, इ. स. १८१४ (८८४-८८६); खंडोजी नाईक—हैबतराव गायकवाड, सिंधुदुर्ग येथील सरंजाम भरतगडास नेण्यासंबंधी, ७ सव्वाल, सु. १२१४/३ ऑक्टोबर १८१३ (८००-८०१); दिनकरराव गायकवाड—पांडुरंग नाईक, करवीरकरांनी घेतलेल्या कर्जाची फेड, ४ सफर, सु. १२१४/२७ जानेवारी १८१४ (८६७-८६८) तसेच हैबतराव गायकवाड यास, स्वरुपजी क्षीरसागर याच्या जागी दुसरा वकील न पाठविण्याबाबत, २ जिल्हेज, सु. १२१६/४ नोव्हेंबर १८१५ (९६१-९६२); बाजीराव रघुनाथ प्रधान—कमाविसदार व सरंजामी सरदार इ., त्रिंबकजी डेंगळे यास पकडण्याबाबत बक्षीस व इनाम, ४ रज्जब, सु. १२१७/२१ मे १८१७ (९९५-९९७); त्रिंबकजी पाटील व बापूजी हरि—भाऊ महाराज, यशवंतराव बागल यांच्या इनाम गावांची मोकळीक, इ. स. १८१७ (९९१-९९३); भाऊ महाराज व दिनकरराव गायकवाड—प्रभाकरपंत जोशी : पांडुरंग नाईक याच्या कर्जाची फेड, २३ मोहरम, सु. १२१४/१६ जानेवारी १८१४ (८६९-८७२); यशवंतराव घाटगे—स्वरुपजी क्षीरसागर : पुणे भेटीसंबंधी, १० जिल्हेज, सु. १२१४/४ डिसेंबर १८१३ (८४६); स्वामी मठ करवीर—एलफिन्स्टन निपाणीकरांकडून होणारा उपसर्ग, १५ रमजान, सु. १२१७/१० ऑगस्ट १८१६ (६९९८-७००३); वासुदेव पंडित—गोपाळपंत देव, पुणे मुक्कामी घेतलेले कर्ज, २५ जिल्काद, सु. १२१६/२९ ऑक्टोबर १८१५ (९५७); हैबतराव गायकवाड—कल्याणराव बापू : चिंचणीकर देसाई यांची करवीरी रवानगी, इ. स. १८१४ (९३१).

**प्रेषकाचा नामोल्लेख नसलेली**—सुंदराबाई : सामानगडावरील बखेडा, १५ जाखर, सु. १२१४/१५ जून १८१३ (७६५) व कर्जाऊ ऐवजासंबंधी, इ. स. १८१४ (९१७).

**प्रेषक वा प्रापक यांचा नामोल्लेख नसलेली**—कृष्णराव गोपाळ याच्या बदलीसंबंधी, इ. स. १८१४ (८७३-८७५); करवीरच्या राज्य कारभारासंबंधी, २ जिल्हेज, सु. १२१६/४ नोव्हेंबर १८१५ (९६३-९६७).

**याद्या**—एलफिन्स्टनकडून सुंदराबाई यांना पाठविलेली वस्त्रे व जवाहीर, ९ जिल्हेज, सु. १२१५/२२ नोव्हेंबर १८१४ (६८९९-६९००); एलफिन्स्टन याने छत्रपतीस पुत्रप्राप्ती निमित्त पाठविलेला आहेर, इ. स. १८१५(९३९) एलफिन्स्टन याने जिजाबाई यांच्या गर्भाधान प्रसंगी पाठविलेली वस्त्रे व जवाहीर, २७ मोहरम, सु. १२१६/२९ डिसेंबर १८१५ (९४२-९४३); निपाणीकरांकडून मिळालेल्या



रुमाल क्र. ४०, पुडके क्र. १—समाप्त

**याद्या (चालू)—**

करवीरकरांच्या गावाच्या सोडचिठ्या, ९ सव्वाल, सु. १२१४/५ ऑक्टोबर १८१३ (८०५-८१७); निपाणीकराकडून सोडचिठ्या मिळालेली करवीरकरांची गावे, १४ जिल्काद, सु. १२१४/८ नोव्हेंबर १८१३ (८२१-८२६); निपाणीकराकडून होणाऱ्या उपसर्गाच्या बंदोबस्ताविषयी, ८ रज्जब, सु. १२१४/७ जुलै १८१३ (७६६-७७०); सईबाईच्या गर्भाधानानिमित्त एलफिन्स्टनकडून आलेला आहेर, ९ जिल्हेज, सु. १२१५/२२ नोव्हेंबर १८१४ (९०३-९०४); सिंधुदुर्गास खर्चासाठी दिलेली जमीन, १० ऑगस्ट १८१५ (९५२-९५३); हिम्मत बहाद्दर यांचा सरंजाम व ठाणे हुपरी यांच्या इंग्रजाकडून आणलेल्या सोडचिठ्या, २२ रज्जब, सु. १२१४/२१ जुलै १८१३ (७८१-७८४).

## रुमाल क्र. ४१, पुडके क्र. १

**ज. क्र. १९५, रु. क्र. ४१, पु. क्र. १, का. सं. ७००६-७०८१ (७६), सु. स. ११२५-१२५१, इ. स. १७२४-१८५०.**

**आज्ञापत्रे—छत्रपति (शिवाजी ३ रे) यांची**—देवी नाईक : इंग्रजांची लुटलेली तरांडी व फतेमाऱ्या याची चौकशी, ज्येष्ठ व. ५ रा. श. १३१/२८ जून १८०४ (७०२८); महंमद इब्राहीम मुनशी वकील : इंग्रजांशी करावयाचा तह, २६ रज्जब, सु. १२१३/५ ऑगस्ट १८१२ (०४३); रघुनाथ पै : इंग्रजांचे सिंधुदुर्ग येथील तारु सामान सुद्धा परत करणे, इ. स. १७९२ (०२३).

**इतर—छत्रपति (संभाजी १ ले)**—मोकदमानी देहाय तर्फ असंडोली : धोंडी भास्कर यास तर्फ असंडोलीचे सरदेशकुलकर्ण वतन, पौष शु. १०, रा. श. ५१/१४ डिसेंबर १७२४ (००६-०१४); राजमंडळ करवीर—रयत व लोक किल्ले सिंधुदुर्ग : किल्ला कंपनी सरकारकडे दिल्यासंबंधी, १ सव्वाल, सु. १२१३/७ ऑक्टोबर १८१२ (०५५).

**इनामपत्र—दिवाण जंजिरे सिंधुदुर्ग**—रामेश्वरभट : श्री देव मालवणच्या श्रावणमास अनुष्ठानाबाबत जमीन इनाम, २ रमजान, सु. १२४४/२७ सप्टेंबर १८४३ (७०७७).

**करारनामा**—मालवण व सिंधुदुर्ग याबाबत करवीरकर व कंपनी सरकार यांच्यामधील, १ सप्टेंबर १८१२ (७०४५-०५४) तसेच नोकर जहागिरदार वगैरेनी घेतलेला आपला मुलूख सोडवून देण्याबाबत तिसरे शिवाजी यांनी कंपनी सरकारास लिहून दिलेला, १२ जिल्काद, सु. १२११/१० डिसेंबर १८१० (०२९).

**करारपत्र**—सिंधुदुर्ग येथील उपाध्येपणासंबंधी गणेशभट व बाबूराव उपाध्ये यांच्यामधील, २७ मोहरम, सु. १२०३/१९ मे १८०३ (७०२६-०२७).

**कलमबंदी**—इंग्रजाकडील करवीरकरांच्या कामकाजाविषयी, ६ साबान, सु. १२२७/५ मार्च १८२७ (७०६५-०६८).

**तहनामा**—जिजाबाई व कंपनी सरकार यामध्ये सिंधुदुर्गाबाबत झालेला, १२ जानेवारी १७६६ (७०२०-०२१).

**पत्रे—छत्रपति (शिवाजी ३ रे) यांची**—कर्नल डौस : नारो गिरमाजी व उदाजीराव घाटगे यांच्या स्वाधीन भरतगड करणे, २२ रावल, सु. १२१३/२६ मार्च १८१३ (७०४२); कर्नल स्मिथ : सिंधुदुर्गाच्या हिशेबी कागदपत्रांची रवानगी, १७ मोहरम, सु. १२१३/२१ जानेवारी १८१३ (०३८); जॉन फदोसीन : कामकाजाविषयी महंमद इब्राहिम व क्षीरसागर सविस्तर सांगतील, ३ सव्वाल, सु. १२१३/९ ऑक्टोबर १८१२ (०४४).

**छत्रपति (संभाजी २ रे) यांची**—एलफिन्स्टन : पाठवलेल्या यादीप्रमाणे कामे व्हावी याअर्थी, ११ रमजान, सु. १२१३/१८ सप्टेंबर १८१२ (०३०) व निपाणीकरांचा बंदोबस्त, १० रज्जब, सु. १२१३/२० जुलै १८१२ (०४०); कर्नल डौस : उदाजीराव घाटगे मजकूर सांगतील, १५ जावल, सु. १२१३/१६ मे १८१३ (०३७) व कामकाजाविषयी, १७ रावल, सु. १२१३/२१ मार्च १८१२

**रुमाल क्र. ४१, पुडके क्र. १—चालू**

**पत्रे—छत्रपति (संभाजी २ रे) यांची** (चालू)—

**(७०६२)** ; कर्नल स्मिथ : सिंधुदुर्ग येथील जखिरेचे सामान भरतगडास पोचते करणे, १० जिल्काद, सु. १२१३/१५ नोव्हेंबर १८१२ (०३६) ; जॉन फदोसीन : मदत न पोचल्याने कबनूर तालुक्याची खराबी, २९ जाखर, सु. १२१३/९ जुलै १८१२ (०३१).

**छत्रपति (बुवासाहेब) यांना**—गोपाळराव आत्माराम : बडोद्यास गेलेली तोतयाबाई, ६ रावल, सु. १२२५/२९ ऑक्टोबर १८२४ (०६३) ; नीलकंठ मल्हार : क्षेमसमाचार, २४ रज्जब, सु. १२२६/४ मार्च १८२६ (०६४) ; मोरो चिटको : खास विडयांची रवानगी, १८ रमजान, सु. १२२७/१५ एप्रिल १८२७ (०७६).

**छत्रपति (संभाजी २रे) यांना**—एलफिन्स्टन : किल्ले मालवणच्या सोडचिठ्ठ्या, २४ सव्वाल, सु. १२१३/३० ऑक्टोबर १८१२ (०३२-०३३) ; व्यंकटराव नलवडे : सिंधुदुर्ग येथे इंग्रजांच्या पलटणी उतरण्यासंबंधी, २८ सव्वाल, सु. १२१३/३ नोव्हेंबर १८१२ (०३४-०३५).

**इतर**—देवी नाईक—छत्रपती (शिवाजी ३ रे) : कंपनी सरकारची लुटलेली तरांडी फतेमाऱ्या इत्यादी माल भरून देण्याबाबत, इ. स. १७७९–१८१२ (०२२) ; महंमद इब्राहिम मुनशी, हरिपंत कगेरोकर, सात कलमी यादी मंजूर करून पाठवणे, १५ रमजान, सु. १२०३/१० जानेवारी १८०३ (०२५).

शिव दीक्षित कासीकर—रेसिडेंट सिंधुदुर्ग : वर्षासनाची रक्कम मिळण्याबाबत, १९ जिल्काद ; सु. १२१५/२ नोव्हेंबर १८१४ (७०५९) ; सुंदराबाई—कर्नल डौस : कंपनी सरकारशी स्नेहसंबंध १० जावल, सु. १२१३/११ मे १८१३ (०३९) ; हैबतराव गायकवाड—उदाजी घाटगे : इंग्रजाकडील कामकाज मर्जी राखून करणे व मालवणचा किल्ला इंग्रजास खाली करून देणे, २७ सव्वाल, सु. १२१३/२ नोव्हेंबर १८१२ (०५६) हैबतराव गायकवाड—कर्नल डौस : भरतगडच्या सोडचिठ्ठ्यांची पोच, १२ राखर, सु. १२१३/१४ एप्रिल १८१३ (०४१).

**प्रेषकाचा नामोल्लेख नाही**—सुंदराबाई—सिंधुदुर्गाची व्यवस्था इ. स. १८१२–२१ (०५७-०५८).

**प्रकरणी कामे**—नागपूरकर घाटगे बाजी यांची करवीर भेट इ. स. २८ सप्टेंबर १८४९ (७०८०-०८१).

**याद्या**—करवीरकर व बडोदेकर यांच्यातील विवाहसंबंधी बोलणी करण्यासाठी गेलेल्या सभासदांची, इ. स. १८४५–५० (७०७८-०७९) ; करवीरहून छत्रपतीस आलेल्या पत्रांची उत्तरे, २९ रज्जब, सु. १२२७/२६ फेब्रुवारी १८२७ (०७१-०७५) ; करवीरहून छत्रपतीस पाठविलेली पत्रे, २० जाखर, सु. १२२७/१९ जानेवारी १८२७ (०६९) ; लग्नानिमित्त कापड खरेदी, इ. स. १८००–१२ (०२४) ; वनस्पती औषधे, १ रमजान, सु. १२२७/२९ मार्च १८२७ (०७०) ; सिंधुदुर्गाबाबतच्या तहाच्या पाचव्या कलमातील बदलासंबंधी, इ. स. १० ऑगस्ट १८१५ (०६०-०६१).

**वतनपत्र**—छत्रपति (शंभु)—धोंडी भास्कर सरदेशकुलकर्णी मामले प्रभावळी : तर्फ असंडोलीचे सरदेशकुलकर्णाचे वतन, पौष शु. ५, रा. श. ५१/९ डिसेंबर १७२४ (७०१५-०१९).

**ज. क्र. १९५, रु. क्र. ४१, पु. क्र. २, का. सं. ७०८२–७१४५ (६४), सु. स. ११६१–१२४४, इ. स. १७१०–१८४३.**

**अर्ज**—राजसबाई घोरपडे—छत्रपति (शिवाजी ४ थे) : जप्तीतील हसूर गावची मुक्तता करण्याची विनंती, २५ रमजान, सु. १२४४/२० ऑक्टोबर १८४३ (७१४४).

**आज्ञापत्रे**—छत्रपति (बुवासाहेब)—अमृतराव पंडित प्रतिनिधि : कापशीहून नेलेली घोडी परत करणे, १४ जाखर, सु. १२३५/१८ ऑक्टोबर १८३४ (७१३६) ; छत्रपति (संभाजी २ रे)—भगवंतराव

**रुमाल क्र. ४१, पुडके क्र. २—चालू**

**आज्ञापत्रे (चालू)—**

प्रतिनिधि : बहिणाबाई यांच्या उखळडी गांवास होणारा उपद्रव बंद करण्याबाबत, ७ जिल्काद, सु. १२१३/१२ नोव्हेंबर १८१२ (०९८) व ३ रमजान, सु. १२१७/२९ जुलै १८१६ (०९९).

**राजमंडळ करवीरकडून**—खासगी मामला : कुंभोज येथील नाईकीचे वतनासंबंधी, १९ साबान, सु. १२२८/६ मार्च १८२८ (१३४) ; गांव कामगार कुंभोज : नाईकीच्या वतनासंबंधी, १९ सवाल, सु. १२२८/६ मार्च १८२८ (१३३) ; गांवकामगार निगवे ; दाजी रामचंद्र व बाळकृष्ण गोपाळ देशपांडे यांना देशपांडेपणाचे वतन इनाम इ. स. १८३६ (१३७) व बाबाजी रघुनाथ नाडगौडा यांना नाडगौडापणाचे वतन इनाम, इ. स. १८३६ (१३८).

**इतर**—राजमंडळ खासगी मामला—गांवकामगार खुपीरे : श्रावणमासासाठी आणलेले साहित्य, २७ जिल्हेज, सु. १२२७/२ ऑगस्ट १८२६ (१२५).

**करारपत्र**—पाटील, कुलकर्णी, चौगले इत्यादी—नानासाहेब पाटणकर सरलष्कर : टिकपूर्लीचा महसूल हप्तेबंदीने देण्यासंबंधी, २८ जिल्काद, सु. १२१८/१० ऑक्टोबर १८१७ (७१३२).

**पत्रे—छत्रपति (बुवासाहेब) यांना**—आप्पाजी देसाई : लबेच्या सामानाची रवानगी, २० रज्जब, सु. १२२७/१७ फेब्रुवारी १८२७ (७१२४) ; दिनकरराव गायकवाड : दिवाणसाहेब (सईबाई) यांची प्रकृती, इ. स. १८२६–३८ (१३१) ; दौलतराव घोरपडे : साहेब बहादद्दूर यांच्या भेटीबाबत, १२ राखर, सु. १२२५/४ डिसेंबर १८२४ (११६) ; बाबासाहेब व चिमासाहेब : खास विडयांची रवानगी इ. स. १८२५–३८ (११७–१२२) ; मोरो चिटको : दिवाणसाहेब (सईबाई) यांच्या प्रकृतीसंबंधी, ६ रावल, सु. १२२७/८ ऑक्टोबर १८२६ (१२३) व खास विडयांची रवानगी, ५ राखर, सु. १२२७/६ नोव्हेंबर १८२६ (१२६) ; विठोजी मोहिते : नगारखान्याचे बांधकामासाठी, छावण्या पुरविण्याबाबत, इ. स. १८२१–१८३८ (१३४–१३५).

**जयसिंगराव घाटगे—नानीसाहेब घाटगे**—करवीरकराकडून कागल तालुक्यास होणारा उपद्रव, १९ मोहरम, सु. १२२०/८ नोव्हेंबर १८१९ (१०१) ; जिजाबाई दाभाडे यांचा मृत्यु, २१ मोहरम, सु. १२२०/१० नोव्हेंबर १८१९ (१०२) ; करवीरकरांचा बंदोबस्त, ९ रावल, सु. १२२०/२७ डिसेंबर १८१९ (१०३–१०६) व २९ राखर, सु. १२२२/२४ जानेवारी १८२२ (११०–११३).

**इतर**—छत्रपति (बुवासाहेब)—बहिणाबाई : प्रतिनिधीकडून होणाऱ्या उपद्रवाचा बंदोबस्त, इ. स. १८२२–३८ (११५) ; नारायण श्रीरंग (मुंबई)—छत्रपति (शिवाजी ३ रे) : वरचेवर पत्र पाठवणे, इ. स. १७६०–१८१२ (०८२) ; रघुनाथराव घोरपडे—छत्रपति (शिवाजी ४ थे) : रामचंद्रराव घोरपडे सेनापति यांना पुत्रप्राप्ती, ११ रज्जब, सु. १२४२/२९ ऑगस्ट १८४१ (१४१) ; कमळाबाई पाटणकर—दिनकरराव गायकवाड : गजाबाई खानविलकर यांच्या मुलीचा विवाह, ५ जावल, सु. १२४३/१५ जून १८४२ (१४३) ; कलेक्टर चॅपलीन—नारायणराव : हुंडेकर शिंपी याची कापड खरेदीची बाकी, १५ ऑगस्ट १८१८ (१००) ; कृष्णराव महिपत सुभेदार रत्नागिरी—आबाजी राम मैराळ व आप्पाजी बेंदरे सरदेशकुलकर्णी मामले प्रभावळी : वतनाच्या भाऊबंदी वाटणीसंबंधी, २१ रज्जब सु. ११९५/२ फेब्रुवारी १७९५ (०८४–०९२) ; पंडित महाराज —सईबाई : क्षेमसमाचार, ६ राखर, सु. १२४१/७ जून १८४० (१३९) ; बाबाजी पाटील भोसले—नानीसाहेब घाटगे : नाडगौडी व देशमुखी वतनास होणारा उपद्रव ; १९ मोहरम, सु. १२२०/८ नोव्हेंबर १८१९ (१०७–१०८) ; वहिवाटदार शंभु महादेव देवस्थान—सुंदराबाई : बुवासाहेब छत्रपति यांचा विवाह, इ. स. १८१२–२५ (०९७).

दिनकरराव (प्रापकाचा नामोल्लेख नाही), क्षेमसमाचार, इ. स. १८१२–२५ (०९५–०९६).

रुमाल क्र. ४१, पुडके क्र. २—समाप्त

**इतर (चालू)—**

**(प्रेषकाचा नामोल्लेख नाहीं)**—छत्रपति (संभाजी २ रे): निपाणीकर करवीर मुलखात घेतलेल्या वसुलीबाबत पुणे येथे इंग्रजाशी झालेली बोलणी, इ. स. १८१२–१३ (७०९३–०९४);

**यादीपत्रे—करवीर दरबार यास**—पो. एजंट (टाऊनशेंड): बायजाबाई शिंदे यांच्या मुलीशी छत्रपतींचा विवाह करण्या प्रकरणी, ज्येष्ठ वद्य ३०, शके १७६४/८ जुलै १८४२ (७१४२); पो. एजंट (निसबट): छत्रपतींचे इंग्रजी शिक्षणासाठी पंतोजीची नेमणूक, इ. स. २९ नोव्हेंबर १८४१ (१४०);

**याद्या**—करवीरहून आलेल्या पत्रांस बुवासाहेब छत्रपतींनी पाठविलेली आज्ञोत्तरे, २५ रज्जब, सु. १२२७/२२ फेब्रुवारी १८२७ (७१२७–७१३०); बेरड, मांग, चोर इत्यादींच्या चौकशीसाठी नेमावयाचे कारकून इत्यादी लोक, इ. स. १८१९ (१०९); भुयेकर इत्यादी भोसले मंडळीसंबंधी, इ. स. १७७९–१८१२ (०८३); वतन इनाम इत्यादीबाबत बयासाहेब याजकडील पत्रे, बिनसाली (१४५);

**ज. क्र. १९५, रु. क्र. ४१, पु. क्र. ३, का. सं. ७१४६–७२३२ (८७), सु. स. ११७३–१२५०, इ. स. १७७२–१८४९.**

**ठराव यादी**—विठोजी व प्रीतीराव चव्हाण हिम्मत बहाद्दर यामधील जिंदगीच्या वाटणीची, मार्गशीर्ष व. ७, शके १७११/९ डिसेंबर, १७८९ (७१५२—१५३).

**पत्रे—छत्रपति (बुवासाहेब) यांना**—उदाजीराव चव्हाण व मोरो चिटको: सुभानजी निकम हुजरे यास करवीरी ठेऊन घेणे, बापोजी जगदाळे हे आज्ञापत्र येण्यापूर्वीच लष्करास गेल्याबाबत कृष्णाजी साळोखे हे मोर्चेलाचा जोड व सहावा वाड्याकडील दागिने घेऊन येत असल्याबावत इ. मजकूर कळविल्यासंबंधी, इ. स. १८२२–१८३० (७१७०–१७१) व रोट पाठविण्याकरिता बसविलेली लष्कराची डाक उठविण्याची आज्ञा, इ. स. १८२२–३० (१७२); बाळकृष्ण बाबूराव: पाच्छापूर कंकणवाडी मार्गे जाणाऱ्या इंग्रज अधिकाऱ्यास मदत करण्याबाबत, ११ सफर, सु. १२२६/२४ सप्टेंबर १८२५ (१८०); बाळोजी निकम व नारो गंगाधर: केदारजी सरनोबत याचे वर्षश्राद्ध, ४ जाखर, सु. १२२६/१३ जानेवारी १८२६ (१७९); बाळोजी भोसले व बाळोजी आप्पाजी: श्री. जोतिर्लिंगाचा प्रसाद पाठविल्याबाबत, इ. स. १८२२–३८ (१७८); मोरो चिटको: आईसाहेब यांची प्रकृति, २३ रावल, सु. १२२८/१५ ऑक्टोबर १८२७ (१८४); रताजीराव चव्हाण: ससे व लबे पाठविल्यासंबंधी, १२ साबान, सु. १२२७/११ मार्च १८२७ (१८८); व ससे, कोंबड्या इ. पाठवल्याबाबत, २२ रज्जब, सु. १२२८/९ फेब्रुवारी १८२८ (१८९); सदाशिव बाबूराव: पत्रावळी व द्रोण पाठविले आहेत, २ रावल, सु. १२२७/४ ऑक्टोबर १८२६ (१८६–१८७);

**उदाजीराव चव्हाण—छत्रपति (बुवासाहेब)**—महालदार, पथके देसक व पागेकडील लोक यांच्या खर्चासंबंधी, इ. स. १८२२–३८ (१६६–१६७); क्षेमसमाचार, इ. स. १८२२–३८ (१६८); वडगांव येथील कुलकर्णीचे वतन, इ. स. १८२२–३८ (१६९); हरीभक्त परायण बाबा पेटकर यांना आश्रमासाठी मदत, इ. स. १८२२—३८ (१७३–१७४) कलमबंदी यादीची रवानगी, इ. स. १८२२ (१७५).

**इतर**—भाऊ महाराज—छत्रपति (बाबासाहेब व बुवासाहेब) टाकळी व दत्तवाड यामधील सीमा तंटा, १७ साबान, सु. १२१९/२२ जून १८१८ (१६३); गणपतराव धोंडदेव निदसुरे मुा मुंबई—छत्रपति (शिवाजी ३ रे): क्षीरसागर याजकडे परत दिलेले २००० रु., कार्तिक शु. ४ शके १७३५/२८ ऑक्टोबर १८१३ (१४८); रताजीराव चव्हाण—छत्रपति (शिवाजी ४ थ): सदाशिव कोडोलीकराकडे रद्द कर्जास असलेली गांवे, आषाढ व १०, शके १७६४/१ ऑगस्ट १८४२ (२०७) व बेळगांव भागात सागवानी लाकूड मिळत नसल्यासंबंधी, इ. स. १८४५–६६ (२१०); आनंदराव रामचंद्र—गुंजाबा गायकवाड: राघोपंत आळतेकर यांची रवानगी, इ. स. १७७९ १८१२ (१४९); आबाजी भगवंत—बळवंतराव वाघुर्डेकर:



रुमाल क्र. ४१, पुडके क्र. ३—चालू

**पत्रे—इतर (चालू)—**

चिरंजिवाची रवानगी करीत आहे, बिनसाली (२२८); उदाजीराव चव्हाण—रायाजी जाधव जप्तनमुलूख: कर्जाऊ ऐवजाची फेड, २० जिल्काद, सु. १२११/१८ डिसेंबर १८१० (१५८); अंताजी रघुनाथ—नानासाहेब हवालदार: मनांत विकल्प आणू नये, २४ रज्जब, सु १२२८/११ फेब्रुवारी १८२८ (१९०); जोत्याजीराव चव्हाण—दिनकरराव गायकवाड: हिम्मतबहाद्दर यांच्याशी असलेला भाऊबंदी तंटा, ८ जिल्काद, सु. १२२०/३० ऑगस्ट १८१९ (१६५); नारायणराव रत्नाकर—सदोबा: पाठवलेली पत्रे हुजूर प्रविष्ट करणे, इ. स. १८१२–२५ (१५९); प्रीतीराव चव्हाण—लक्ष्मीबाई चव्हाण; डिग्रज व कर्नाळ या गावचा निम्मे सरंजाम चिंतामणराव आप्पा याजकडून सोडवून घेण्यासाठी रु. ७००० चे कर्ज सयाजी जाधव जप्तन मुलूखकडून घेतलेल्या कर्जफेडीसाठी वरील सरंजाम जप्तनमुलूखकडे देण्याबाबत, इ. स. १८१० (१५७); बच्चाचार्य पंडितराव—दादा पंडितराव: बापू वैद्य मजकूर सांगतील, इ. स. १८२२–३८ (१७७); बाबाजी रघोजी व रावजी पाटील—संताजी पाटील: माणकू पाटील कोगेकर व राणोजी पाटील खाटांगळेकर यामधील म्हैशीचा खटला, बिनसाली (२२६); बाळकृष्ण बाबूराव—शिवाजीपंत खांडेकर: क्षेमसमाचार, १२ साबान, सु. १२३६/३ डिसेंबर १८३५ (१९१); भीवराव देसाई—विठोजी जाधव: फणस पोचल्यासंबंधी, बिनसाली (२२९); मोरो वाजीराव—आप्पा देसाई: क्षेमसमाचार इ. स १८१२–२५ (१६१); राणोजी दळवी व हणमंतराव आबाजी—रावजी खंडोजी पोतनीस: पोतनिसीची आसामी पूर्ववत् प्रमाणे इनाम १ रज्जब, सु. १२२७/२९ जानेवारी १८२७ (१८१); विठोबा—कृष्णाजीपंत—दादा देवधर: बाळाजीपंत गोखले मजकूर सांगतील, बिनसाली (२२७); व्यंकटराव लक्ष्मण—रावजी पारसनीस: निपाणीकर व करवीरकर यामधील लग्नसंबंधाबाबत, इ. स. १८००–१२ (७१५४); सदाशिव अनंत—स्वरुपजी क्षीरसागर: छत्रपतीनी पाठवलेल्या पत्रावरून मजकूर समजेल, इ. स. १८००–१३ (१५५); सिदगौंडा देसाई—आप्पा राजाज्ञा: सोनकेळी पाठविल्याबाबत, इ. स. १७८३–१८१२ (१५०–१५१); सुंदराबाई—भगवंतराव प्रतिनिधि: बहिणाबाई यांच्या सरंजामी गावास होणारा उपसर्ग, १ रमजान, सु. १२१७/२७ जुलै १८१६ (१६२); हणमंतगोंडा देसाई—हिम्मतबहाद्दर चव्हाण: आंबाजी पंत वाकनीस यास जमीन इनाम, इ. स. १७७२–१८१२ (१४६); हणमंत शिवराम—शामराव देशपांडे: सरकार वाड्यात भोजन खर्चासाठी भाताची व्यवस्था इ. स. १७७२–१८१२ (१४७);

**प्रापकाचा नामोल्लेख नसलेली**—गांवकामगार सावगाव: नेरलीकर यांच्या मुलामाणसास पैशासाठी होणारा उपसर्ग, इ. स. १८१२–२५ (१६०); मल्हार बापूजी: मातुश्रीबाई व रावजी मनोळीस सुखरूप पोचल्याबाबत, बिनसाली (२३२); यमाजी हणमंत: वडिलांच्या प्रकृतीसंबंधी, बिनसाली (२२२);

**प्रेषकाचा नामोल्लेख नसलेली**: खासीबाई: गव्हर्नर लॉर्ड नेपियर यांच्या शिल्पशास्त्रावरील मद्रास येथील भाषणाचे छापील पुस्तकांची रवानगी, इ. स. १८७२ (२०८—२०९).

**प्रेषक वा प्रापक यांचा नामोल्लेख नसलेली**—पाठवलेला मसुदा छत्रपतीस दाखवणे, इ. स. १८००–३८ (१५६); चिंतामणराव आप्पा यासाठी पालखी शिल्लक नसल्याने पाठविता येत नाही, इ. स. १८२२–३८ (१७६); यादी कोणास न दाखविता यादीप्रमाणे काम करण्याबाबत, बिनसाली (२२३); आण्णा नेरलीकर याचे पत्र पाठविणे, बिनसाली (२२४); आपल्या सांगण्याप्रमाणे नित्यक्रम चालू असल्याबाबत, बिनसाली (२२५); आप्पाजी मणेर याने कराडकर यांचा देणे ऐवजाचा फडशा करण्याबाबत, बिनसाली (२३०); देणेकरी निघून गेल्यामुळे तूर्त काही करणे अशक्य असल्याबाबत, बिनसाली (२३१).

**प्रकरणी कामे**—बहीरजी गायकवाड यांच्या सरंजामाबाबत, २१ मे १८४७ (७२११–२१२); हिम्मत बहाद्दर इ. सरंजामदारानी

रुमाल क्र. ४१, पुडके क्र. ३—समाप्त

**प्रकरणी कामे (चालू)—**

सरकार हा हुद्दा लावून न घेण्यासंबंधी, ८ फेब्रुवारी १८४९ (७२१६–२२१).

**यादीपत्रे—**पो. एजंट (निसबट)—सदाशिवपंत वकील : रताजीराव चव्हाण यांची जप्त केलेली गावे इ. स. ४ फेब्रुवारी १८४१ (७१९६–१९७); राजमंडळ करवीर—पो. एजंट (टाऊनशेंड) रताजीराव चव्हाण व सदाशिव कोडोलीकर यामधील येणेदेणेचा खटला, ४ जावल, सु. १२४१/४ जुलै १८४० (१९४–१९५) राजमंडळ करवीर पो. एजंट (रीव्हज) : कौलगेकर पाटील यास रताजीराव हिम्मतबहाद्दर याने दिलेला उपद्रव, इ. स. ४ एप्रिल १८४२ (२०६); हिंदुराव गायकवाड—मुख्य कारभारी करवीर : कोतोली येथील दुस्तपट्टी, १५ सव्वाल, सु १२४७/७ ऑक्टोबर १८४६ (२१३–२१५).

**याद्या—**करवीरकर व सातारकर छत्रपती यांची करवीर येथील भेट, माघ व. ३०, शके १७६२/२१ फेब्रुवारी १८४१ (७१९८–७२०१); करवीराहून छत्रपतीस आलेल्या पत्रांची आज्ञोत्तरे, २० रज्जब, सु. १२२७/१७ फेब्रुवारी १८२७ (१८२–१८३); नेर्ली गावास होणारा उपद्रव, इ. स. १८२६ (१८५); राणोजीराव घोरपडे सेनापति यांचा सरंजाम, १५ मोहरम, सु. १२२०/४ नोव्हेंबर १८१९ (१६४); हिंदळे गांवची एकंदर जमाबंदी इ. स. १८४२ (२०२–२०५); हिम्मतबहाद्दर यांचा सरंजाम, इ. स. २ जानेवारी १८४० (१९२–१९३).

## रुमाल क्र. ४२, पुडके क्र. १

**ज.क्र. १९६, रु. क्र. ४२, पु. क्र. १, का. सं. ७२३३–७३१८ (८६), सु. स. ११८०–१२३९, इ.स. १७७९–१८३८.**

**अर्ज—**विठोजी नाईक जाधव—छत्रपती : दोघा बंधूच्या आसामींच्या नोकरीचा बंदोबस्त करण्याची विनंती बिनसाली (७३१३).

**आज्ञापत्र—**छत्रपती (शिवाजी ३ रे)—रायपूर्णय्या : हणमंतराव तमाजी सांगतील त्याप्रमाणे करणे, इ. स. १७७९–१८१२ (७२५१).

**जबाब—**नारायण भट नाशिककर यास दिलेल्या सनदासंबंधी, विठ्ठल जनार्दन याचा, इ. स. १८२३–२५ (७३०३)

**तहनामा—**मामलेदार सिंधुदुर्ग व पंत अमात्य यामध्ये ताा सलासीच्या दोड तक्षिमेबाा झालेला, इ. स. १७७९ (७२३३–२३६).

**पत्रे—**आनंदराव रामचंद्र—आबाजीपंत व बन्चाजीपंत व करवीरकरांच्या कामकाजाविषयी, इ. स. १८१२–२५ (७३०४); खंडो मोरेश्वर परांडेकर—रत्नाकरपंत राजाज्ञा : करवीरकरांचा येणे ऐवज, इ. स. १७७९–१८१२ (२५२); दिनकर बाजी—अंताजीपंत : मुरगुडचे ठाणे ताब्यात आल्यासंबंधी, इ. स. १८२२–३८ (३१०); बाबाजी नारायण—छत्रपति (शिवाजी ३ रे) : दागिने, सणगे इ. ची रवानगी इ. स. १७७९–१८१२ (२५४); बाळाजी जिवाजी—विसाजीपंत कुलकर्णी : कर्जाऊ ऐवजाची पोच, फाल्गुन शु. ७, शके १७३४/ ९ मार्च १८१३ (२९२); बाळाजी नारायण—भाऊ महाराज : नारोपंत नाना याजकडून पत्र पोचले इ. स. १८१२–२५ (३०१); महिपतराव पारसनवीस—दादाजी : करवीरकरांच्या जाबसालांचे उलगडे, इ. स. १८१२–३८ (३०९); माणकोजी गायकवाड—स्वरुपजी क्षीरसागर : बंदोबस्त व्यवस्थित असल्यासंबंधी, माघ शु. ३, शके १७३२/२७ जानेवारी १८११ (२९१), मोरो बाजीराव—स्वरुपजी क्षीरसागर : संभू कदम सविस्तर सांगतील इ. स. १८१२–१३ (३००); राघो हरी—नरहरपंत दाते : कर्जफेडीबाबत, बिनसाली (३१४); विठ्ठलराव गायकवाड—छत्रपति (बुवासाहेब) : बोथाटचाची रवानगी, इ. स. १८२२–३८ (३११); सदाशिव रामचंद्र—धोंडजी निंबाळकर : फणस व आंबे इ. ची रवानगी इ. स. १८१२–३८ (३०८);

रुमाल क्र. ४२, पुडके क्र. १—चालू

**पत्रे (चालू)—**

**प्रापकाचा नामोल्लेख नसलेली—**आप्पाजी आवाजी मुजुमदार व नरहर मोरेश्वर : नारायणभट नासिककर यास दिलेल्या सनदावर सरकारी हुकमाविना निशाण केल्याची कबुली, इ. स. १८२३ (७३०६–३०७) त्याचबाबत बाळाजी बाजीराव यास : २९ रमजान, सु. १२२४/९ जून १८२३ (३०५) व सखाराम आबाजी याची साक्ष इ. स. १८२३ (३०२);

**प्रेषकाचा नामोल्लेख नसलेली—**अंताजीपंत भाऊ : पुण्यास जाताना हरिपुरांत भेटण्याची इच्छा, बिनसाली (३१५); गोपाळजी पोवार : क्षेमसमाचार, इ. स. १८००–१२ (२९०); शामराव सुभेदार : क्षेमसमाचार (बिनसाली) (३१६) व किटली, ठाणे घोडगिरी व पुण्याहून पत्रोत्तर येताच कळविण्याबाबत, बिनसाली (३१८).

**मसुदे—**छत्रपतीनी संस्थानिकास लिहावयाच्या पत्रासंबंधीबिनसाली (७३१७); पुण्यास आलेल्या नवीन इंग्रज अधिकाऱ्यास छत्रपतींनी पाठवावयाच्या पत्रासंबंधी, इ. स. १७७९–१८१२ (२४३).

**याद्या—**श्री. अंबेकडील रुप्याचे दागिने किंवा त्याबद्दल जमा रक्कम, इ. स. १७७९–१८१२ (७२४४–२४६); सुबराव, रघुनाथ सिंग इ. स दिलेल्या शालजोडचा, इ. स. १७७९–१८१२ (२४८); कऱ्हाड हून गहाण असलेले सोडवून आणिलेले दागिने, इ. स. १७७९–१८१२ (२५०); जामदारखान्याकडील धोतरजोडचा, इ. स. १७७९–१८१२ (२५३); नारायण आप्पाजी यंकनमुर्डीकर यांच्या जमिनीबावतची कामे, इ. स. १८२२–३८ (३१२); निपाणीकरांनी करवीरकरांकडून जबरीने लिहून घेतलेली सनदापत्रे, इ. स. १८१२ (२९५–२९६); भाऊ महाराज यांच्याबरोबर पुण्यास पाठवलेले कागदपत्र, इ. स. १८१२ (२९३–२९४); भुगणे येथील वसूल, इ. स. १७९८ (२७७–२८२); भुगणे येथील सरकारी आकार, इ. स. १७८१ (२३७–२४२); विजापूरकर फकीरास दिलेल्या वस्तु, बिनसाली (२४७); सांगलीहून पागेसाठी आणलेले धान्य, इ. स. १७७९–१८१२ (२४९); सिदोजीराव निंबाळकर व सरनाईक प्रा हुकेरी यांच्याकडून आलेली पत्रे, चैत्र शु. १, रा. श. १३८/१४ मार्च १८१२ (२९७–२९८), सिंधुदुर्ग, पद्मगड, राजकोट इ. कडील खर्च, इ. स. १७७९–१८१२ (२५५–२७६); सिंधुदुर्ग येथील दागिने इ. संबंधी इ. स. १८०० (२८३–२८६); सिंधुदुर्गाकडील चौथाईची शिल्लक १६ साबान, सु. १२०१/२ जानेवारी १८०१ (२८७–२८९).

**ज. क्र. १९६, रु.क्र. ४२, पु. क्र. २, का. सं. ७३१९–७३९८ (८०), सु. स. ११८०–१२५९, इ. स. १७७९–१८५८.**

**आज्ञापत्रे—**छत्रपति (शिवाजी ३ रे)—देवी नाईक दुभाषी : कर्नल विल्यम क्लार्क यास घेऊन येण्याबाबत, चैत्र शु. १३, रा.श. १३१/११ एप्रिल १८०५ (७३३१).

**टिप्पण—**चिकोडी व मनोळी येथील करवीरकरांची वहिवाट, २१ मार्च १८५८ (७३८८).

**पत्रे—छत्रपति (शिवाजी ३ रे) यांची—**एलफिन्स्टन : सावंतवाडीकरांनी घेतलेला भरतगड परत मिळण्यासंबंधी, १७ सफर, सु. १२१३/१९ फेब्रुवारी १८१३ (७३३६–३३८); जॉन फदिसोन : इंग्रज पलटणीची मदत, १ जाखर, सु. १२१३/११ जून १८१२ (३३२); नबाब मुल्के जहाखां : गोखल्यांचे पारिपत्य, माघ शु. ५, रा. श. १२६/३० जानेवारी १८०० (३३३).

**इतर—**मुकुंदशेठ कुसे—छत्रपति (बुवासाहेब) : कर्जाऊ ऐवजाची फेड, २ जावल, सु. १२२५/१३ डिसेंबर १८२४ (३६०–३६५); एलफिन्स्टन—छत्रपति (शिवाजी ३ रे) : भरतगडाच्या ताब्यासंबंधी, २३ फेब्रुवारी १८१२ (३३५) व भरतगड सावंतवाडीकराकडून परत देण्यासंबंधी, इ. स. २६ मार्च १८१२ (३३९); एलफिन्स्टन—कृष्णराव गोपाळ : वेंगुर्ला इंग्रजांच्या ताब्यात येण्यासंबंधी, १९ ऑक्टोबर १८१२ (३३४); किटलीसाहेब घोडगिरी—नारायणराव पाटणकर : पत्र पोचल्यासंबंधी, इ. स. १७७९–१८१२ (३२१); गोपाळजी विश्वनाथ गोखले—रावसाहेब : अंतोजीपंत सविस्तर

**रुमाल क्र. ४२, पुडके क्र. २—चालू**

**पत्रे-इतर (चालू)—**

सांगतील, इ. स. १८१२–३८ (७३५२); गोविंद लक्ष्मण शेंबवणेकर—रावसाहेब निंबाळकर : क्षेमसमाचार, बिनसाली (३८९); नारायणराव रत्नाकर—सखारामपंत : बाबाजी बाबाकडून मजकूर समजेल, इ. स. १८१२–३८ (३४८); पो. एजंट—खेमसावंत भोसले : करवीर कराकडील यादीचा उलगडा, ३० सप्टेंबर १८२५ (३६६–३६७); प्रभाकर बल्लाळ जोशी—भाऊ महाराज : सदाशिव फडणीस याचे दागिने चिटणिसाकडून परत मिळण्याबाबत, इ. स. १८१२–२५ (३४१); बापू शिवराम—बापूजीपंत : आप्पाजीपंत कामकाजाविषयी कळवितील, इ. स. १८१२–३८ (३५१) बापू शिवराम—सदाशिवपंत : नेसरीकर शिंदे यांच्या कामाविषयी, इ. स. १८१२–२५ (३४४); बाबाजी क्षीरसागर—ती. बाबा : पाठविलेल्या रुपयांची पोच, इ. स. १८००–१२ (३२९); भवानीबाई निंबाळकर—मानुबाई भोसले : मकर संक्रमणाची तीळ शर्करा भेट, बिनसाली (३९३); भाऊ महाराज—बापू : भास्करराव नंदगांवकर याजकडील कामे, इ. स. १८१२–२५ (३४३); मुकुंदराव पोवार—सुभानजी साळोखे : मंगळागौरीचे व्रताकरिता द्वारकाबाईची रवानगी, इ. स. १७८३–१८१२ (३२६); मोरो बाजीराव—बापूजीपंत : आप्पा हे सविस्तर सांगतील, इ. स. १८१२–३८ (३४९); येसो शिवाजी गोखले—दिनकरपंत नाना : पडवळे रवाना, बिनसाली (३९४); रामचंद्र रघुनाथ—सदाशिवपंत : गोविंदराम मारवाडी याच्या ऐवजाची फेड, इ. स. १८१३–२५ (३५६); रामनारायण शेणवी—अंतोजी पांडुरंग : येणे असलेली खाते बाकी देण्याची व्यवस्था करणे, इ. स. १७७९–१८१२ (३१९); रंगो लक्ष्मण—रावजी वाकनीस : भेटी अंती सर्व कळेल, इ. स. १८२२–३८ (३५७); लहुसाहेब—बाबा महाराज गुरुजी : भरतगडाची सोडचिठ्ठी घेऊन सर्जेराव यांची रवानगी, इ. स. १८१२–१३ (३४०); विठ्ठल आप्पाजी—भगवंतराव मोहिते : धारवाड येथील कामकाजाविषयी, इ. स. १८२२–३८ (३५९); विठ्ठलराव—रावजी : नारायण निकम हे सविस्तर सांगतील, इ. स. १७७९–१८१२ (३२५); विश्वनाथ सखाराम मराठे—अंतोजीपंत : गोपाळपंत काका याजकडील मनोळीचे काम झाल्यासंबंधी, इ. स. १८१२–३८ (३५३); विश्वासराव घाटगे—नारोबा काळे : मिरजेतील सावकाराकडून आलेली पत्रोत्तरे इ. स. १८२२–३८ (३५८); विष्णु—अंतोजीपंत गोखले : गोपाळपंत यांच्या पत्रावरून सविस्तर कळेल, इ. स. १८१२–३८ (३५४); व्यंकाजीकृष्ण—मोरोपंत : छत्रपतीस पाठवलेल्या पत्रांची उत्तरे पाठवण्याबाबत, १७७९–१८१२ (३२४); व्यंकाजी सदाशिव—गाव कामगार वळिवडे : येणे असलेली ऐवज बाकी, बिनसाली (३९५); संभाजीराव शिंदे—रखमाबाई घाटगे : कमळजाबाईची रवानगी, इ. स. १८१२–३८ (३५५); स्वरुपजी क्षीरसागर—आकाराम हवालदार धोंडोपंत याच्या ऐवजाबाबत, इ. स. १७७९–१८१२ (३२३); हणमंत शिवराम भूदरगड—पंत राजाज्ञा : वरातदारास मनाचिठी देण्याबाबत, इ. स. १७८३–१८१२ (३२७); केरोबा—(प्रापकाचा नामोल्लेख नाही) : सांगून पाठवलेले काम करण्यास असमर्थ, बिनसाली (३९६).

**प्रेषकाचा नामोल्लेख नसलेली—**आबा : क्षेमसमाचारासंबंधी, बिनसाली (३९१); राघोपंत : ठाण्याच्या व हुजरे लोकांच्या खर्चाचा बंदोबस्त, बिनसाली (३९०); सदाशिवपंत : करवीरकराकडील येणे ऐवज, इ. स. १८१२–२५ (३४५); सदोबा आबाजी : तपकीर रवाना, बिनसाली (३९२); छत्रपति शिवाजी ३ रे :—चिकोडी, मनोळी बाबतची कामे; १८००–१८१२ (३३०); छत्रपति संभाजी (२ रे) : बळवंतराव चिटणीसाच्या सांगण्यावरून भटजीस सनदा दिल्या असे सखारामपंतांचे सांगणे, बिनसाली (३४६).

**प्रेषक वा प्रापक याचा नामोल्लेख नसलेली**—दौलतराव शिंदे यांच्या मुलीची विवाहपत्रिका पाठविल्याबाबत, इ. स. १८१२–२५ (३४२); जाबसालांचे उलगड करून देण्याची तयारी, इ. स. १८१२–२५ (३४७); आप्पाजीपंत सविस्तर सांगतील, इ. स. १८१२–३८ (३५०); आईसाहेबाकडून मजकूर समजेल, बिनसाली (३९७–३९८).

**रुमाल क्र. ४२, पुडके क्र. २—समाप्त**

**प्रकरणी कामे**—यमगर्णी येथील दिवाणी व फौजदारी कामे, २१ जिल्हेज, सु. १२४९/१८ नोव्हेंबर १८४८ (७३८०–३८३); हिंदूराव गायकवाड सरखवास यास दत्तक घेण्यास मंजूरी, इ. स. २७ जून १८४९ (३८४–३८७).

**मसुदे**—छत्रपति (शिवाजी ३ रे) यांनी बाळाजी मल्हार व मोरो सखदेव यांच्या रवानगीबाबत कर्नल वेलस्ली यास लिहावयाचे पत्र, इ. स. १७७९–१८१२ (७३२०); जाबसालांच्या उलगड्याबाबत उमदे तुल उमराव यानी देवी नाईक यास लिहावयाच्या पत्रासंबंधी, इ. स. १७७९–१८१२ (३२२).

**मोजदाद**—राजकोट तड सिंधुदुर्ग येथील कोठीतील साहित्याची ३० साबान, सु. १२०१/१६ जानेवारी १८०१ (७३२८).

**याद्या**—करवीरहून आलेल्या पत्रांची आज्ञोत्तरे, २२ रज्जब, सु. १२२७/१९ फेब्रुवारी १८२७ (७३६८–३७०); छबिन्यासंबंधी, १५ रावल, सु. १२२७/१७ ऑक्टोबर १८२६ (३७१–३७४).

**हिशेब**—पंत अमात्यांच्या बांदिवडे गावच्या वसुलाचा, इ. स. १८३३ (७३७५–३७९).

**ज. क्र. १९६, रु. क्र. ४२, पु. क्र. ३, का. सं. ७३९९–७४५१ (५३), सु. स. ११८०–१२५२, इ. स. १७७९–१८५१.**

**आज्ञापत्रे—छत्रपति (शिवाजी ३ रे) यांची**—आपूराव रामराव : मकर संक्रमणाचे तिळ शर्करा भेट, इ. स. १७७९—१८१२ (७४०२); महम्मद इब्राहिम मुनसी वकील : जाबसालांचा उलगडा, २१ जावल, सु. १२१३/२२ मे १८१३ (४२०) ; सिदरामराव भोसले : जिवाजी आंबाजी पुंडे यास सिंधुदुर्ग येथे सरदेश व देशकुलकर्णाचे वतन इनाम, १२ सव्वाल, सु. १२०१/२६ फेब्रुवारी १८०१ (४१७);

**ठरावपत्रक**—मनोहरगडाच्या तनख्यासंबंधी कंपनी सरकार, करवीर राजमंडळ व संस्थान सुंदरवाडी यांच्यातील ठराव, ६ मार्च १८२० (७४२६);

**पत्रे**—असि. कलेक्टर व मॅजिस्ट्रेट प्रांत कोकण—छत्रपति (बुवासो) : जमाण्णा वाणी याच्या ऐवजाबद्दल, इ. स. १८२२—३८ (७४२८–४२९); बाळाजी बाजीराव—छत्रपति (बुवासो) नारायण भट नाशिककर यास दिलेल्या सनदा, २९ रमजान, सु. १२२४/९ जून १८२३ (४३२) रेसिडेंट सिंधुदुर्ग—छत्रपति (बुवासो) : देवाळे व कंदलगाव येथील रयतेस वसुलीबाबत होणारा उपद्रव थांबविण्याबाबत, इ. स. १८२२—३८ (४३०–४३१); लुई फर्नांडीस व जॉन फदोसीन—छत्रपति (शिवाजी ३ रे) : त्रिंबक आवजी याची रवानगी करणे, १७ रज्जब, सु. १२१३/२७ जुलै १८१२ (४१९); असि. कलेक्टर दक्षिण प्रांत कोकण—हैबतराव गायकवाड ; तर्फ मसूर येथील करवीरकर व इंग्रजी अंमल याविषयी तंटा सोडविण्याबाबत, ९ मार्च १८२० (४२४–४२५); आप्पाजी कृष्ण—नारायणराव तात्या : क्षमसमाचार, बिनसाली (४५०); गणेश शामजी आपटे—अंताजीपंत : क्षेमसमाचार, इ. स. १८२२–३८ (४३३); चिटको रघुनाथ—आनंदराव धुमाळ : निंबाजीपंत दाजी व देशमुख यांची मुले माणसे करवीरी पोचविल्यासंबंधी, बिनसाली (४४३); दाजी हरि–बाळोजी तगारे : मुलीसाठी स्थळ पाहिल्यासंबंधी, बिनसाली (४४४); नारायण श्रीरंगजी—मोरोपंत तात्या चिटणीस : रुप्याची तपकिरीची डबी पाठवण्याबाबत, इ. स. १८१२–२५ (४२२) ; नारो कृष्ण—नागोजीराव घाटगे : सिंधुदुर्ग येथील रोजमुरा व नालबंदी यांची व्यवस्था, इ. स. १७७९–१८१२ (४०३) ; नारो शिवराम चक्रदेव—वामन रावजी : वरचेवर वर्तमान कळविणे, बिनसाली (४५१); बापू शिवराम—बापूजीपंत : भाऊ महाराजांना पत्र पाठवल्याबाबत, इ. स. १८१२–२५ (४२१); भाऊ महाराज–सदाशिवपंत : व्यंकटराव यास कामासाठी करवीरी ठेवून घेतल्यासंबंधी, इ. स. १८१२–२५ (४२३) ; राघो जिवाजी आळतेकर—सरखवास बापू : येणे असलेल्या ऐवजाची व्यवस्था करावी, इ. स. १८२२–

